**सरकारी कामगार अधिकारी, गट-ब (वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे ४४००/-) या पदावर तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. पदोन्न-२०१५/प्र.क्र.२८०/कामगार-८**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २८ जून, २०१८.

वाचा: १) कामगार आयुक्त,मुंबई यांचे पत्र क्र.आस्था/सकाअ/पदो/१२१५/कार्यासन-२, १६८८, दि. ५/९/२०१५ व क्र.१९६१, दि. १५/१०/२०१५.
२) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.बीसीसी-२०१७/ प्र.क्र.३१२A/१६-ब, दि.२९/१२/२०१७.

**शासन निर्णय:-**

कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील गट-क मधील कर्मचा-यांच्या सेवाजेष्ठता यादीतील सेवाजेष्ठतेनुसार खालील कर्मचा-यांची सरकारी कामगार अधिकारी, गट-ब (वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे ४४००/-) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | कर्मचा-याचे नाव, प्रवर्ग व पदनाम | ज्येष्ठता क्रमांक | पदोन्नतीचा प्रवर्ग | पदोन्नतीने नियुक्ती करावयाचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती सं. अ. आघारकर (खुला/ अधीक्षक) | ५२ | खुला | कामगार आयुक्त, मुंबई कार्यालय येथील कार्यासन-४ (रचना व कार्यपध्दती) या रिक्त पदावर |

२. सदर अधिका-यांची सरकारी कामगार अधिकारी पदावरील पदोन्नती त्यांच्याविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभागाने दि.२८/१२/२०१७ रोजी दिलेल्या अभिप्रायानुसार खुल्या प्रवर्गातील कर्मचा-यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागावर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५/०५/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सा.प्र.वि./कार्यासन १६-ब ने दि.२९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत.

त्यानुसार सदर अधिकारी यांची सरकारी कामगार अधिकारी, गट-ब पदावरील पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

४. सदर आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५६२/१२, दि.२५/११/२०१६अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२८१७५५४७५२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Bhartiya

Digitally signed by Satish Bhartiya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bc2294cab74b107d5cfbd8bda13dc5782df4340706cbae9c3aa79354a2cd32b, serialNumber=5e865d0cdc2a4b33d56e3ba0f1693db677c69e1582ba24d78c4b12a02126e493, cn=Satish Bhartiya
Date: 2018.06.28 18:01:42 +05'30'

**( सतिश भारतीय )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत** -

१) मा. मंत्री (कामगार ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (कामगार ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.प्रधान सचिव (कामगार ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संबंधित अधिका-यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्याच्या विनंती सह.
५) अपर कामगार आयुक्त, मुंबई.
६) कामगार उप आयुक्त (प्रशासन), कामगार आयुक्त कार्यालय, मुंबई
७) संबंधित अधिकारी (द्वारा कामगार आयुक्त,मुंबई )
८) महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),१,महाराष्ट्र ,मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवड नस्ती (कामगार -८).